सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत निरिक्षणालय शाखा शासनाच्या ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणणे व विद्युत प्रणाली चाचणी व तपासणीविषयी ग्राहकाभिमुख स्वयंप्रमाणीतता / व्यवसाय सुलभता (Self Certification/Ease of Business) संकल्पना परिणामकरीत्या अंमलात आणण्याच्या दृष्टीने प्रस्तुत निरिक्षणालयाची नियमावली व कार्यपध्दती नव्याने बनविणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१४/प्र.क्र.५८८/ऊर्जा-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :२६ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

देशातील विद्युत क्षेत्रात होणारा गतीमान विकास, विज्ञान व तंत्रज्ञान यामुळे विद्युत क्षेत्रात झालेले तांत्रिक बदल, काळानुसार आवश्यक असलेले बदल तसेच भविष्यात विद्युत क्षेत्राच्या प्रगतीच्या दृष्टीने, वीज निर्मिती, पारेषण, वितरण, ट्रेडिंग व वीज वापर या क्षेत्रांशी निगडीत नियमांमधील सुसूत्रता आणण्याचे दृष्टीने विद्युत कायदा २००३, त्या आधारीत विद्युत नियम-२००५ व केंद्रीय विद्युत प्राधिकरण (विद्युत पुरवठा व सुरक्षा संबधी उपाययोजना) अधिनियम २०१० बनविण्यात आले आहेत. सदरील विद्युत कायदा, नियम आणि विनियम यानुसार राज्यातील विद्युत क्षेत्र व त्या अनुषंगाने विद्युत उद्योगाचा विकास या विद्युत कायदा २००३ च्या प्रमुख उद्देशांची पुर्तता करण्याची जबाबदारी ही राज्य शासनाची असते.

विद्युत कायदा २००३ व त्या आधारीत बनविण्यात आलेले विद्युत नियम २००५ व केंद्रीय विद्युत प्राधिकरण (विद्युत पुरवठा व सुरक्षा संबधी उपाययोजना) अधिनियम २०१० यांमधील तरतुदीचे पालन व अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने **मुख्य विद्युत निरीक्षक/विद्युत निरीक्षक** ह्यांच्या नियुक्तीची तरतूद विद्युत कायदा २००३ चे कलम १६२ (१) नुसार करण्यात आली आहे. सदरील तरतुदीनुसार राज्य शासन अधिसुचनेद्वारे यथोचित अर्हता असलेल्या व्यक्तीस मुख्य विद्युत निरीक्षक/विद्युत निरीक्षक या पदावर नियुक्त करु शकते.

विद्युत कायदा २००३ तसेच केंद्रीय विद्युत प्राधिकरण (विद्युत पुरवठा व सुरक्षा संबधी उपाययोजना) अधिनियम २०१० ला अनुसरुन विद्युत निरीक्षणालयास विविध कार्ये आखुन देण्यात आलेली आहेत.

देशातील बहुतांशी प्रगतशील राज्यात जसे गुजरात, आंध्रप्रदेश, हरयाणा इत्यादी ठिकाणी विद्युत निरीक्षणालय हे शासनाच्या विद्युत/ऊर्जा विभागांतर्गत कार्यरत आहेत, केंद्र शासनातंर्गत विद्युत निरीक्षक कामकाजासाठी जे मुख्य विद्युत निरीक्षक/विद्युत निरीक्षक केंद्र शासनामार्फत नेमले जातात ते देखील केंद्र शासनाच्या विद्युत मंत्रालय, भारत सरकार यांचे अधिपत्याखाली काम करतात.

परंतु महाराष्ट्रात विद्युत निरिक्षणालयातील (विद्युत निरीक्षक व त्याच्या अखत्यारीतील कर्मचारी) पद मंजुरी (post) व वित्तीय तरतूद (Budget) ही ऊर्जा विभागाशी संलग्न असून देखील प्रशासकीय बाबींकरीता सदरील सर्व अधिकारी व कर्मचारी हे सार्वजनिक बांधकाम विभागाशी संलग्न आहेत.

प्रत्यक्षात विद्युत कायदा २००३ मधील तरतुदी आणि त्या अनुषंगाने बनविण्यात आलेले विद्युत नियम व विनियम ह्यांची अंमलबजावणी व देखरेख तसेच राज्यातील विद्युत क्षेत्र व इतर राज्यातील विद्युत क्षेत्राशी निगडीत बाबी हाताळणे ह्याची महत्वपूर्ण जबाबदारी ही ऊर्जा विभागाची असून ऊर्जा विभाग विद्युत क्षेत्रातील अशा सर्व बाबी हाताळण्यासाठी सक्षम आहे.

सध्या विद्युत निरीक्षणालयातील कार्यरत सर्व अधिकारी व कर्मचारी वर्गाची पदे व त्यासाठी वित्तीय तरतूद (Budget) ही ऊर्जा विभागामार्फत केली जात असून प्रशासकीय बाबींकरिता सदरील सर्व अधिकारी व कर्मचारी हे सार्वजनिक बांधकाम विभागाशी संलग्न असल्यामुळे विद्युत निरीक्षणालयाच्या ऊर्जा विभागाशी निगडीत कार्यपध्दतीमध्ये एक विसंगती निर्माण झाली आहे म्हणूनच विद्युत कायदा २००३, विद्युत नियम २००५ व केद्रीय विद्युत प्राधिकरण (सुरक्षा तथा विद्युत पुरवठा संबंधी) विनिमय २०१० मधील सर्व नियमांची योग्यप्रकारे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने तसेच विद्युत निरीक्षणालयाचे कामकाज परिणामकारक व सुरळीतरित्या होण्यासाठी, सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विद्युत निरीक्षणालय हे शासनाच्या ऊर्जा विभागाच्या कार्यकक्षेत आणणे गरजेचे आहे. सदर विद्युत निरीक्षणालय संपूर्णपणे शासनाच्या ऊर्जा विभागाच्या प्रशासकीय अंमलाखाली (जो या विद्युत निरीक्षणालयाचा मुळ विभाग सुध्दा आहे) आणल्यास विद्युत निरीक्षणालयाच्या प्रशासकीय व वित्तीय बाबीबद्दलच्या कामकाजामध्ये सुसूत्रता येईल. त्याअनुषंगाने विद्युत निरीक्षणालय शाखा ऊर्जा विभागाच्या प्रशासकीय अंमलाखाली आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

१. सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत निरीक्षणालय शाखा शासनाच्या ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. विद्युत अधिनियम २००३ व त्या अनुषंगाने बनविण्यात आलेले नियम व विनियम सक्षमपणे राबविण्याकरिता सध्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेले विद्युत निरीक्षणालय, विद्युत निरीक्षक व त्यांचे अखत्यारितील अधिकारी आणि कर्मचारी ह्यांची सन २००६ च्या आकृतीबंधानुसार, सोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ नुसार मंजूर असलेली सर्व पदे (रिक्त पदांसह) तसेच संबंधित पदांवर कार्यरत अधिकारी, कर्मचाऱ्यांसह शासनाच्या ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यास मान्यता देण्यात येत आहे व शासन निर्णय क्र.ईएसटी-२०११/प्र.क्र.१२७/प्रशासन-१,सा.बां.वि., दि. १८.०६.२०१२ अधिक्रमित करण्यात येत आहे.

३. विद्युत कायदा २००३, कलम १८० नुसार व त्या अनुषंगाने बनविण्यात आलेले नियम व विनियम राबविण्यासाठी, मुख्य विद्युत निरीक्षक या पदाचे तसेच विद्युत निरीक्षणालय शाखेतील सर्व पदांचे

(रिक्त पदांसह) सेवा भरती नियम (Recruitment Rules) तसेच सदर पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ठरविण्यासाठी नियम ऊर्जा विभागामार्फत यथावकाश बनविण्यात येतील.

४. ग्राहकाभिमुख स्वयंप्रमाणीतता/व्यवसाय सुलभता (Self Certification/Ease of Business) संकल्पना परिणामकारकरीत्या अंमलात आणण्याच्या दृष्टीने नियमावली व कार्यपध्दती ऊर्जा विभागामार्फत बनविण्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३०७१७११२६८३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siraj Manjamiya Inamdar

Digitally signed by Siraj Manjamiya Inamdar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2d1eaca55f11636d64409b0876ac18f4b304d9ded51ebfe55337efc9e04c3606, cn=Siraj Manjamiya Inamdar
Date: 2015.03.09 17:13:15 +05'30'

**(सि.मं.इनामदार)**
**शासनाचे सहसचिव**

**प्रत,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं. १, १३वा मजला, कफ परेड, कुलाबा,मुंबई ०५.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र शासन, सा.बां.वि., मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई

अवर सचिव (रोखशाखा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (प्रशासन-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, (१४६१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.

## परिशिष्ट-१

शासनाच्या क्र.मुअवि-००५/सीआर ८९५७/ऊर्जा-२ दि. २०.०२.२००६ च्या शासन निर्णयानुसार विद्युत निरीक्षणालय कार्यालयाचा मंजूर आकृतीबंध खालीलप्रमाणे:-

| **मुख्य अभियंता (विद्युत) महाराष्ट्र शासन यांच्या अधिपत्याखालील आस्थापनेचा सुधारीत आकृतीबंध** | | |
|---|---|---|
| **अनु.क्र** | **पदाचे नाव** | **दि. २०.२.२००६ च्या शासन निर्णयाद्वारे मंजूरकेलेली पदे** |
| १ | मुख्य अभियंता (विद्युत) | - |
| २ | अधीक्षक अभियंता | ४ |
| ३ | विद्युत निरीक्षक | ४० |
| ४ | सहाय्यक विद्युत निरीक्षक | ७८ |
| ५ | कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता | ३९७ |
| ६ | उप संचालक (लेखा) | १ |
| ७ | विद्युत शुल्क निरीक्षक | ९ |
| ८ | अधीक्षक | २ |
| ९ | सहाय्यक विद्युत शुल्क निरीक्षक | २२ |
| १० | मुख्य लिपिक/लेखापाल | १८ |
| ११ | लघु लेखक | ४ |
| १२ | आरेखक | १ |
| १३ | वरिष्ठ लिपिक | १०२ |
| १४ | कनिष्ठ लेखा परिक्षक | १ |
| १५ | उद्ववाहन यांत्रिक | २ |
| १६ | अनुरेखक नि लिपिक | १ |
| १७ | कनिष्ठ लिपिक/टंकलेखक | २०९ |
| १८ | जीपचालक | १८ |
| १९ | नाईक | १४ |
| २० | दप्तरी | १३ |
| २१ | शिपाई | ९२ |
| २२ | मदतनीस | ११ |
| २३ | चौकीदार | ११ |
| | **एकूण** | **१०५०** |